**सरसेनापती संताजी घोरपडे यांचे स्मारक मौजे कापशी (सेनापती) ता. कागल, जि. कोल्हापूर येथे उभारण्यास निधी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन निर्णय क्रमांकः स्मारक -३११०/८६१/प्र.क्र.१३७/२९
१९ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
तारीख: १४ ऑक्टोबर, २०१५.

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: स्मारक ३३१०/८६५/ प्र.क्र. १३७/ २९, दिनांक २५ नोव्हेंबर, २०१०.
२) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्मारक ३३१०/ ८६५/ प्र.क्र.१३७/ २९, दिनांक २४ नोव्हेंबर, २०११.
३) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्रमांक कार्या-७/गृह-१/आरआर/१३७३/१२, दिनांक २९.८.२०१२.
४) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक ३११० / ८६५ / प्र. क्र. १३७ / २९, दिनांक ६ मार्च, २०१३.
५) जिल्हाधिकारी,कोल्हापूर यांचे पत्र क्रमांक नियो./कार्य-८/लेखा/१७४४/२०१३, दि.२८.६.२०१३.
६) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक ३११० / ८६५ / प्र.क्र. १३७ / २९, दिनांक ३१ जानेवारी, २०१४.
७) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक ३११० / ८६५ / प्र. क्र. १३७ / २९, दिनांक २० जून, २०१४.

<u>प्रस्तावना -</u>

सरसेनापती संताजी घोरपडे यांचे स्मारक मौजे कापशी (सेनापती), ता. कागल, जिल्हा कोल्हापूर येथे उभारण्यासाठी रु.१६७.२७ लाख इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास शासनाने उपरोक्त संदर्भ क्रमांक (१) व (२) अन्वये प्रशासकीय मान्यता दिली असून त्याअनुषंगाने स्मारकाच्या कामासाठी उपरोक्त संदर्भ क्र. ४, ६, व ७ येथे नमूद शासन निर्णयाअन्वये अनुक्रमे रु.१७.२९ लाख , रु.४५.०० लाख व रू. ५०.०० लाख असा एकूण ११२.२९ लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर स्मारकाच्या पुढील बांधकामासाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मौजे कापशी (सेनापती) ता.कागल, जि.कोल्हापूर येथील सरसेनापती संताजी घोरपडे यांच्या स्मारकाच्या बांधकामासाठी रु.५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यात येत असून सदर निधी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचेकडे वितरीत करण्यात येत आहे. सदरचा निधी वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७ एप्रिल, २०१५ मधील परिच्छेद क्र.१४ नुसार ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू वर्षी या कामावर खर्ची घालण्याची जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दक्षता घ्यावी.

२. सदरहू खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक ए-४,
२०५९, सार्वजनिक बांधकामे,
(८०) सर्वसाधारण
(८००) इतर खर्च
(००)(०३) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके/पुतळे यांचे बांधकाम
योजनेतर (२०५९ ३२०१)
२७-लहान बांधकामे

३. उपरोक्त निधीतून खर्च करण्यासाठी प्रमुख लिपीक,जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर (सांकेतांक क्रमांक २६०१०००९४८) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर स्मारकावरील खर्चाची जबाबदारी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांची राहील. त्यांनी निधीच्या उपयोगितेसंबंधीची माहिती उपयोगिता प्रमाणपत्रासह वेळोवेळी शासनास सादर करावी व महालेखापालांच्या लेख्याशी खर्चमेळाबाबतची कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग पाच मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील परिच्छेद ७ (क) व परिच्छेद ८ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१४१४४७०८३८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravikant
Ganpat Panchal

Digitally signed by Ravikant Ganpat Panchal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4d632f688a5def40e348dd4096560792e82ea8b6c44eb75bc50ebc2af6045a7c, cn=Ravikant Ganpat Panchal
Date: 2015.10.14 14:50:05 +05'30'

**(र. ग. पांचाळ)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. पालक मंत्री, जिल्हा कोल्हापूर, कोल्हापूर,
४. अपर मुख्य सचिव (र. व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई
६. विभागीय आयुक्त, पुणे,

७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
८. महालेखापाल-१, ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
९. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा) मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१२. निवासी उपजिल्हाधिकारी, कोल्हापूर,
१३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (पश्चिम) कोल्हापूर,
१४. कक्ष अधिकारी,वित्त विभाग (अर्थसंकल्प-१४/ व्यय-४) मंत्रालय,मुंबई,
१५. कक्ष अधिकारी, कार्यासन-२५, सामान्य प्रशासन विभाग,
१६. निवडनस्ती (कार्यासन-२९).